## महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन आदेश क्रमांकः कअनि-१११९/प्र.क्र.४९/१४-ब

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मुंबई ४०००३२.
दिनांक : १९ ऑगस्ट, २०२०

## आदेश

श्री.हि.या.दुफारे, कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग यांच्या सेवा पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील पुराभिलेख संचालनालयाच्या पुरालेखागार, नागपूर या कार्यालयातील सहाय्यक संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्षाच्या कालावधीसाठी सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्री. दुफारे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर एक वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा ..इ) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट - दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (सां.का.२) व महसूल व वन विभाग (आस्थापना) यांनी प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती ठरवाव्यात.

३. श्री. दुफारे यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (सां.का.२) व महसूल व वन विभाग (आस्थापना) यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री. दुफारे यांना महसूल व वन विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१९१४२८०३७४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ad a8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f 73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.08.19 14:37:47 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री.हि.या.दुफारे, कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**प्रत,**

१) सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

२) सह/ उप सचिव (आस्थापना), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.

३) उप सचिव (सा.कां.२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

४) संचालक, पुराभिलेख संचालनालय, १५६, एलफिन्स्टन महाविद्यालय इमारत, महात्मा गांधी मार्ग, फोर्ट, मुंबई

५) निवड नस्ती / संग्रहार्थ.